**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन ज्ञापन क्रमांक- दुरुस्ती-०२१७/प्र.क्र.१८०/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २७ मार्च २०१७.

**विषय** :- पोलीस आयुक्त, नागपूर शहर, यांच्या अधिकारक्षेत्रातील "आकार-३५" शासकीय निवासस्थाने, इमारत क्र.१२ व १३, यांच्या दुरुस्तीसाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ दुरुस्ती-कार्यक्रम-आढावा/३७१/०९, दिनांक १५.०२.२०१७.

**ज्ञापन** :-

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी, पोलीस आयुक्त, नागपूर शहर, यांच्या अधिकारक्षेत्रातील "आकार-३५" शासकीय निवासस्थाने, इमारत क्र.१२ व १३, यांच्या दुरुस्तीची कामे करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामांसाठी उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप-विभाग क्र.३, नागपूर, यांनी सन २०१६-१७ च्या दरसूचीनुसार रु.८०,६१,१६६/- इतक्या खर्चाचे अंदाज तयार केले आहेत. हे खर्चाचे अंदाज कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग-१, नागपूर, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले आहेत व ते पुढीलप्रमाणे सुधारले आहेत:-

| अ.क्र. (१) | कामाचे नाव (२) | खर्चाचे अंदाज (३) |
|---|---|---|
| १ | "आकार-३५" शासकीय निवासस्थाने, इमारत क्र.१२ ला रंग देणे, फ्लोअरिंग करणे आणि दरवाजे, खिडक्या व प्रसाधनगृहे यांची दुरुस्ती करणे. | रु.४४,६०,०५५/- |
| २ | "आकार-३५" शासकीय निवासस्थाने, इमारत क्र.१२ व १३, यांच्या बाह्य भिंती मजबूत करणे. | रु.३८,२९,१५१/- |
| **एकूण** | | **रु. ८२,८९,२०६/-** |

**४.** परिच्छेद ३ मधील तत्क्यात विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे खर्चाच्या अंदाजांना प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दिली आहे. त्या अनुसार, पोलीस आयुक्त, नागपूर शहर, यांच्या अधिकारक्षेत्रातील “आकार-३५” शासकीय निवासस्थाने, इमारत क्र.१२ व १३, यांच्या दुरुस्तीची कामे करण्यासाठी, परिच्छेद ३ मधील तत्क्यात विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे, **रु.८२,८९,२०६/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये या अटीवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग- मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (००) (०१), जिल्हा पोलीस बल, (दत्तमत) (२०५५ ०१६८), २७, लहान बांधकामे, या खाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१२५/इमा-२, दिनांक ०४.०३.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३२७१८३११९९४२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.03.27 18:33:15 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**
१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) पोलीस आयुक्त, नागपूर शहर, नागपूर.
४) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, नागपूर.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग-१, नागपूर.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
८) निवड फाईल (पोल-७).